आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत
आस्थापना विषयक निधी (१%) अनुज्ञेय
करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन निर्णय क्रमांकः स्थाविका ०५१४/प्र.क्र.४०/का.१४८२,**

मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक: **५ सप्टेंबर, २०१४**

**वाचा**

**शासन निर्णय क्रमांकः स्थाविका २०११/प्र.क्र.४७/का.१४८२, दिनांक: १३ सप्टेंबर, २०११.**

**प्रस्तावना**

खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत देशातील सर्व लोकसभा व राज्यसभा खासदारांना ₹५ कोटी प्रति वर्ष प्रति खासदार याप्रमाणे निधी अनुज्ञेय करण्यात आला आहे. खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमाची अंमलबजावणी ही जिल्हाधिकारी कार्यालयाच्या स्तरावरुन करण्यात येते. सन २०११-१२ पासून खासदार निधीमध्ये वाढ करण्यात आली असून, तो ₹२ कोटीवरुन ₹५ कोटी प्रति खासदार प्रति वर्ष इतका करण्यात आला आहे. खासदार निधीमध्ये वाढ करीत असतांना दरवर्षी अनुज्ञेय निधीच्या २% निधी नोडल जिल्हाधिकाऱ्यांना आस्थापना विषयक खर्चासाठी अनुज्ञेय करण्यात आला आहे. म्हणजेच, प्रत्येक खासदारांच्या नोडल जिल्हयांना प्रति वर्ष प्रति खासदार ₹१० लक्ष इतका निधी आस्थापना विषयक खर्चासाठी अनुज्ञेय करण्यात आला आहे. सदर २% निधीपैकी ०.२% इतकी रक्कम (प्रति खासदार प्रति वर्ष ₹१ लक्ष याप्रमाणे) ही State Nodal Department अर्थात नियोजन विभागास अनुज्ञेय करण्यात आली आहे, तर ०.८% इतकी रक्कम (प्रति खासदार प्रति वर्ष ₹४ लक्ष याप्रमाणे) नोडल जिल्हयाला आस्थापना विषयक कार्यालयीन खर्चासाठी वापरता येते. उर्वरित १% रक्कम ही (प्रति खासदार प्रति वर्ष ₹५ लक्ष याप्रमाणे) खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या District Level Monitoring/Evaluation साठी वापरता येते.

२. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत, राज्यातील २८९ विधानसभा सदस्य व ७८ विधानपरिषद सदस्य असे एकूण ३६७ आमदारांना, त्यांच्या मतदारसंघात स्थानिक विकास कामे सुचविता यावीत, यासाठी ₹२ कोटी प्रति वर्ष प्रति आमदार, याप्रमाणे निधी अनुज्ञेय करण्यात आला आहे. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाची अंमलबजावणीही जिल्हाधिकारी कार्यालयाच्या स्तरावरुन

करण्यात येते. मात्र, खासदार निधीप्रमाणे आस्थापना विषयक बाबींसाठी आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत खर्च अनुज्ञेय नाही. त्यामुळे सदर कार्यक्रमांतर्गत आस्थापना विषयक बाबींसाठी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

वरील बाब विचारांत घेता, खासदार निधीच्या धर्तीवर राज्यात राबविण्यात येत असलेल्या, आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत, सर्व विधानसभा व विधानपरिषद सदस्यांना अनुज्ञेय असलेल्या ₹२ कोटी प्रति आमदार प्रति वर्ष निधीच्या १% इतका निधी नोडल जिल्हाधिकाऱ्यांना आस्थापना विषयक किंवा कार्यालयीन खर्चासाठी अनुज्ञेय करण्यात येत आहे. म्हणजेच, प्रत्येक आमदारांच्या नोडल जिल्हयांना प्रति वर्ष प्रति आमदार ₹२ लक्ष इतका निधी आस्थापना विषयक खर्चासाठी अनुज्ञेय राहील.

२. सदर ₹२ लक्ष इतक्या निधीपैकी,

(अ) ₹२०,०००/- इतकी रक्कम (प्रति आमदार प्रति वर्ष याप्रमाणे) संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी State Nodal Department अर्थात नियोजन विभागास वर्ग करावी.

(ब) ₹५,०००/- इतकी रक्कम (प्रति आमदार प्रति वर्ष) संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (नियोजन) यांच्या कार्यालयास वर्ग करावी.

(क) ₹७५,०००/- इतकी रक्कम ही नोडल जिल्हयाला आस्थापना विषयक खर्चासाठी अनुज्ञेय राहील.

(ड) उर्वरित ₹१ लक्ष रक्कम ही आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या District Level Monitoring/Evaluation साठी वापरण्यात यावी.

३. खासदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या धर्तीवर, जिल्हाधिकारी कार्यालय स्तरावर जिल्हाधिकारी व जिल्हा नियोजन अधिकारी यांचे संयुक्त नांवे एक बँक खाते उघडून, आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत विधानसभा आणि विधानपरिषद सदस्यांना अनुज्ञेय असलेल्या प्रति वर्ष ₹२ कोटी इतक्या निधीच्या १% रक्कम, अर्थात ₹२ लक्ष इतका निधी त्यामध्ये आहरित करुन ठेवण्यात यावा. उदा. एखाद्या जिल्हयातील विधानसभा तसेच विधानपरिषद सदस्यांची संख्या १० असल्यास, ₹२० लक्ष इतका निधी त्या खात्यात जमा करण्यात यावा.

४. सदर निधीतून प्रति आमदार प्रति वर्ष ₹२०,०००/- याप्रमाणे निधी नियोजन विभागास वर्ग करण्यात यावा. या प्रयोजनासाठी, नियोजन विभाग स्तरावर उप सचिव, अवर सचिव आणि कक्ष अधिकारी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने राष्ट्रीयकृत बँकेत बचत खाते उघडण्यात यावे. याशिवाय, जिल्हाधिकारी कार्यालयाकडून विभागीय आयुक्तालयातील उपायुक्त (नियोजन) यांच्या कार्यालयास

₹५,०००/- इतका निधी वर्ग करण्यात यावा. या प्रयोजनासाठी विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (नियोजन) यांच्या स्वाक्षरीने राष्ट्रीयकृत बँकेत बचत खाते उघडण्यात यावे.

५. जिल्हा स्तरावर, राज्य स्तरावर तसेच विभाग स्तरावरील कार्यालयांना मिळणाऱ्या आस्थापना विषयक कार्यालयीन खर्चाचा विनियोग खालीलप्रमाणे करण्यात यावा:-

(अ) **<u>जिल्हा स्तरावरील कार्यालये</u>**:- जिल्हा स्तरावरील कार्यालयांसाठी प्रति आमदार प्रति वर्ष ₹७५,०००/- इतका निधी कार्यालयीन खर्चासाठी अनुज्ञेय असेल. सदर निधी खालील बाबींवर खर्च करता येऊ शकेल:-

१) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमासाठी तयार करावयाच्या On Data Entry Software मध्ये माहिती भरण्यासाठी कंत्राटी पध्दतीने दोन व्यक्तींची नेमणूक करण्यासाठी.

२) समाजामध्ये आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाबाबत जनजागृती करण्यासाठी.

३) कार्यालयीन कामकाजासाठी लेखनसामग्री खरेदी करण्यासाठी.

४) कार्यालयीन कामकाजासाठी एका वर्षात जास्तीत जास्त तीन संगणक व सोबत प्रिंटर्स खरेदी करण्यासाठी.

५) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या कामाची पाहणी करण्यासाठी कार्यालयीन वाहनात डिझेल/पेट्रोल भरण्यासाठी (एका वर्षाच्या कालावधीत जास्तीत जास्त ₹२५,०००/- च्या मर्यादेत).

६) टेलिफोन/फॅक्स चार्जेस, टपाल तिकिटे खरेदी करण्यासाठी.

७) कार्यालयीन उपयोगासाठी आवश्यक ते फर्निचर करण्यासाठी.

८) आढावा बैठक आयोजित करणे, संबंधित यंत्रणांचे अधिकारी/कर्मचारी यांचे प्रशिक्षण.

याशिवाय प्रति आमदार प्रति वर्ष ₹१ लक्ष इतकी रक्कम आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या Third Party Monitoring किंवा Physical Inspection वर खर्च करता येईल. कोणत्याही परिस्थितीत कार्यालयीन खर्चासाठीची रक्कम ही प्रति आमदार प्रति वर्ष ₹७५,०००/- पेक्षा अधिक असणार नाही.

(ब) **<u>विभाग स्तरावरील कार्यालये</u>**:- विभाग स्तरावरील कार्यालयांसाठी प्रति आमदार प्रति वर्ष ₹५,०००/- इतका निधी कार्यालयीन खर्चासाठी अनुज्ञेय असेल. सदर निधी खालील बाबींवर खर्च करता येऊ शकेल:-

१) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या विभाग स्तरावरील आढाव्यासाठी तसेच विभाग स्तरावर Data Compilation साठी कंत्राटी पध्दतीने एका व्यक्तीची नेमणूक करण्यासाठी.

२) समाजामध्ये आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाबाबत जनजागृती करण्यासाठी.

३) कार्यालयीन कामकाजासाठी लेखनसामग्री खरेदी करण्यासाठी.

४) कार्यालयीन कामकाजासाठी एका वर्षात जास्तीत जास्त एक लॅपटॉप, एक संगणक व सोबत प्रिंटर्स खरेदी करण्यासाठी.

५) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या कामाची पाहणी करण्यासाठी कार्यालयीन वाहनात डिझेल/पेट्रोल भरण्यासाठी (एका वर्षाच्या कालावधीत जास्तीत जास्त ₹ २५,०००/- च्या मर्यादेत).

६) टेलिफोन/फॅक्स चार्जेस, टपाल तिकिटे खरेदी करण्यासाठी.

७) कार्यालयीन उपयोगासाठी आवश्यक ते फर्निचर करण्यासाठी.

८) आढावा बैठक आयोजित करणे.

(क) **<u>राज्य स्तरावरील कार्यालये</u>**:- राज्य स्तरावरील कार्यालयांसाठी प्रति आमदार प्रति वर्ष ₹ २०,०००/- इतका निधी कार्यालयीन खर्चासाठी अनुज्ञेय असेल. सदर निधी खालील बाबींवर खर्च करता येऊ शकेल:-

१) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या Third Party Monitoring किंवा Physical Inspection साठी संस्थेची नेमणूक करणे.

२) राज्य स्तरावर कार्यक्रमाचे संनियंत्रण करण्यासाठी कंत्राटी पध्दतीने जास्तीत जास्त दोन व्यक्तींची नेमणूक करण्यासाठी.

३) समाजामध्ये आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाबाबत जनजागृती करण्यासाठी.

४) कार्यालयीन कामकाजासाठी लेखनसामग्री खरेदी करण्यासाठी.

५) कार्यालयीन कामकाजासाठी एका वर्षात जास्तीत जास्त एक लॅपटॉप, दोन संगणक व सोबत प्रिंटर्स खरेदी करण्यासाठी.

६) आमदार स्थानिक विकास कार्यक्रमाच्या कामाची पाहणी करण्यासाठी कार्यालयीन वाहनात डिझेल/पेट्रोल भरण्यासाठी (एका वर्षाच्या कालावधीत जास्तीत जास्त ₹ १,००,०००/- च्या मर्यादेत).

७) टेलिफोन/फॅक्स चार्जेस, टपाल तिकिटे खरेदी करण्यासाठी.

८) कार्यालयीन उपयोगासाठी आवश्यक ते फर्निचर करण्यासाठी.

९) आढावा बैठक आयोजित करणे.

६. वर प्रस्तावित केल्याप्रमाणे, आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१५-१६ या वर्षाच्या सुरुवातीला नियोजन विभागाकडून निधी प्राप्त होताच १% रक्कम जिल्हाधिकारी कार्यालय स्तरावर उघडण्यात येणाऱ्या राष्ट्रीयकृत बँकेच्या बचत खात्यात जमा करण्यात यावी. त्याचप्रमाणे, आमदार निधी हा Lapsable Fund असल्याने जिल्हाधिकारी कार्यालय, उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तालय किंवा नियोजन विभाग स्तरावर कार्यालयीन खर्चासाठी जमा करण्यात आलेली रक्कम त्या वर्षासाठी अथवा जास्तीत जास्त पुढील वर्षासाठी खर्च करता येईल.

७. सदर शासन निर्णयाच्या तरतुदी दिनांक १ एप्रिल, २०१५ पासून लागू करण्यात येतील. तसेच या तरतुदी दिनांक ३१ मार्च, २०१९ पर्यंत लागू राहतील, त्यानंतर त्या आपोआप संपुष्टात येतील. तथापि, सदर तरतुदी पुढे चालू ठेवायच्या असल्यास, त्याबाबत सर्वंकष आढावा घेऊन त्यानुसार स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०५१७१७५६२७१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arunkumar S Belgudri

Digitally signed by Arunkumar S Belgudri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Arunkumar S Belgudri
Date: 2014.09.06 14:39:17 +05'30'

**( अरूण शि. बेळगुद्री )**
शासनाचे उप सचिव

प्रत,

१ मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
५. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
७. मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व),
८. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
९. विभागीय आयुक्त (सर्व),

१०.जिल्हाधिकारी (सर्व),
११. नियोजन विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव,
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
१३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१४. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१८. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांची कार्यालये (सर्व),
१९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (सर्व),
२०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
२१. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने),
२२. वित्त विभाग, (व्यय-८)
२३. ग्रंथपाल, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-४०० ००१.
२५. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०.
२६. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-१.
२७.महाराष्ट्र कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३.
२८. इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
२९. नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१.
३०. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
३१. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, मातोश्री हाईट, पद्माबाई ठक्कर मार्ग, रुपारेल कॉलेज जवळ, माटुंगा (प), मुंबई-४०० ०२८.
३२. निवड नस्ती (कार्यासन १४८२), नियोजन विभाग, मंत्रालय.